कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना
कोविडमुळे मृत्यु झालेल्या कर्मचा-याच्या
वारसास विमा कवच / सानुग्रह सहाय्य
लागू करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः कोरोना-२०२१/प्र.क्र. ८४ /वित्त-४
बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
दिनांक : २५ एप्रिल, २०२२.

वाचा :

१.ग्रामविकास विभाग शासन परिपत्रक,क्रमांक- चौविआ-२०२०/प्रक्र-४२/ वित्त-४, दिनांक ८ जुलै, २०२०

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/ व्यय-९ दिनांक २९ मे, २०२०

**प्रस्तावना :**

कोरोनाच्या सार्वत्रिक साथीमध्ये सर्वेक्षण, शोध, माग काढणे, प्रतिबंध, चाचणी, उपचार व मदतकार्य यांचेशी संबंधित कर्तव्य बजावित असताना शासनाच्या विविध विभागातील विविध प्रवर्गातील कर्मचारी यांचा कोरोना विषाणूशी जवळून संबंध येत आहे. अशा कर्मचा-यांची काळजी घेण्यासाठी शासन कटिबध्द असून या असुरक्षित परिस्थितीत त्यांच्या मागे ठामपणे उभे राहण्याचा शासनाचा निर्धार आहे.

केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाने त्यांच्या दि.२८.३.२०२० च्या आदेशानुसार यासंबंधी आरोग्य कर्मचारी यांचेसाठी विमा कवच योजना लागू केली आहे.

ग्रामविकास विभागाने कोविड-१९ या कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी ग्रामपंचायत स्तरावर काम करणा-या काही संवर्गातील कर्मचा-यांना दिनांक ८ जुलै, २०२० च्या शासन परिपत्रकान्वये विमा कवच लागु केले होते . दि.३० सप्टेंबर, २०२० पर्यत कोरोना विषयक कामकाजाच्या कर्तव्यावर असताना कोरोना या संसर्गजन्य विषाणूची लागन होऊन मृत्यू झालेल्या कर्मचा -यांच्या वारसांना विमा रक्कम रु.५० लाखाचे विमा कवच देण्यात आले आहे . दि.३० सप्टेंबर, २०२० नंतर कोरोना विषयक कामकाजाच्या कर्तव्यावर असताना कोरोना या विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू झालेल्या कर्मचाऱ्यांच्या वारसांना रु.५० लाखाचे विमा कवच/सानुग्रह सहाय्य देण्याची बाब शासन विचारधीन होती. आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

ग्रामविकास विभागाच्या अधिनस्त जिल्हा परिषदांच्या आस्थापनेवरील कार्यरत अधिकारी /कर्मचारी, ग्रामपंचायत कर्मचारी, संगणक परिचालक तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये कार्यरत असलेले कंत्राटी पद्धतीवरील कर्मचारी /कामगार मोठया प्रमाणात कोविड संबंधित कर्तव्ये पार पाडीत आहेत. कोविड १९ च्या सार्वत्रिक साथीशी लढा देण्यासाठी सक्रीय राहून कर्तव्य बजावणा -या अशा कर्मचाऱ्यांना पाठबळ देण्याच्या दृष्टीकोनातून व अशा कर्मचाऱ्यांचा कोरोना कर्तव्य बजावताना दुदैवाने मृत्यु झाल्यास त्यांचे कुटुंबियांच्या पाठीशी उभे राहण्यासाठी रु . ५० लाखाचे विमा कवच शासन परिपत्रक क्रमांक. चौविआ-२०२०/प्र.क्र.४२/वित्त-४ दि.८ जुलै, २०२० अन्वये दि.३० सप्टेंबर, २०२० पर्यंत दिले होते. कोरोना विषयक कामकाजावर कर्तव्य बजावत असताना कोरोना या संसर्गजन्य आजाराची लागण होऊन दिनांक ३० जून, २०२१ पर्यंत मृत्यू झालेल्या ग्रामविकास विभागाच्या अधिनस्त जिल्हा परिषदांच्या आस्थापनेवरील कार्यरत अधिकारी /कर्मचारी, ग्रामपंचायत कर्मचारी, संगणक परिचालक तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये कार्यरत असलेले कंत्राटी पद्धतीवरील कर्मचारी /कामगार यांच्या कुटुंबियांना रुपये ५० लाखाचे विमा कवच / सानुग्रह सहाय्य देण्याच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. कर्मचाऱ्यांच्या मृत्युच्या सर्व प्रकरणी रू . ५० लक्ष रकमेचे विमा कवच /सानुग्रह सहाय्य खालील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येईल.

१. कोविड संबंधित कर्तव्यावर नेमणुकीबाबत सक्षम प्राधिकारी याचे आदेशाची प्रत.

२. सदर कर्मचारी त्याच्या इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्युच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कर्तव्यावर हजर असला पाहिजे . ही बाब मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद अथवा अन्य कोणत्याही पदनिर्देशित विभाग प्रमुख यांच्याकडून सत्यापित प्रमाणित करण्यात येईल.

३.सदर मृत्यू कोविड -१९ शी संबंधित असल्याबाबतचे वैद्यकीय प्रमाणपत्र, शासकीय रुग्णालये, जिल्हा रुग्णालये, महानगरपालिका रुग्णालय, आयसीएमआर नोंदणीकृत खाजगी रूग्णालय/ प्रयोगशाळा यांचेकडून प्राप्त अहवालाच्या आधारे करण्यात येईल.

४.सदर विमा कवच सानुग्रह सहाय्य योजना जिल्हा परिषद अंतर्गत कार्यरत सर्व अधिकारी / कर्मचारी, ग्रामपंचायत कर्मचारी, संगणक परिचालक तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये कार्यरत असलेले कंत्राटी पद्धतीवरील कर्मचारी/कामगार म्हणजेच त्यांच्या वेतन व त्याचे अनुदान ग्रामविकास विभागाकडून दिले जाते असे अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना ग्रामविकास विभागाकडून सानुग्रह सहाय्य देण्यात येईल. इतर विभागाकडून मिळणारे वेतन व भत्यांच्या अनुदानातून ज्या अधिकारी कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते दिले जातात त्यांचे प्रस्ताव ग्रामविकास विभागाकडे पाठविण्यात येऊ नयेत . त्यांच्या विमा कवच सहाय्य व अनुदानाबाबत त्या त्या संबंधित विभागाने जिल्हा परिषदेकडून तपशिल घेण्यात येऊन निर्णय घ्यावा.

५. कोरोना विषयक कामकाजाच्या कर्तव्यावर असताना करोना या संसर्गजन्य आजारामुळे दिनांक ३० जून २०२१ पर्यंत निधन झालेल्या अधिकारी / कर्मचारी यांचे प्रस्ताव ग्रामविकास विभागाकडे पाठविण्यात यावे.

प्रस्तुत खर्चासाठी अर्थसंकल्पिय लेखाशिर्ष / निधी प्राप्त झाल्यावर स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी उपरोक्त सर्व बाबींची खात्री करूनच प्रस्ताव ग्रामविकास विभागाकडे पाठवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०४२५११४६०८६७२० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: cn=PRAVIN DEVICHAND JAIN, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=sofin4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2022.04.25 15:17:39 +05'30'

(प्रविण देविचंद जैन)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत.

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा / विधान परिषद
७. मा.विधानसभा व विधान परिषद सदस्य.
८. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
९. मा.अ.मु.स. (ग्रा.वि व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
१०.महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
११.महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)

१२.सर्व विभागीय आयुक्त. (महसूल)
१३.सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
१४.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५. सर्व उपसचिव / अवर सचिव, ग्राम विकासविभाग, मंत्रालय, मुंबई
१६.सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
१७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१८. जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
१९.सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
२०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१.वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७ / वित्त आयोग कक्ष.)
२२.ग्राम विकास विभाग ( सर्व कार्यासने )
२३.निवड नस्ती का.वित्त-४, ग्राम विकास विभाग, मुंबई .१